**१४ व्या वित्त आयोगाच्या "तांत्रिक मनुष्यबळ" या घटकाखाली मा. उच्च न्यायालय व इतर न्यायालयात १९९ काल्पनिक पदे निर्माण करुन बाह्ययंत्रणेद्वारे भरण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्र. संगणक-२०१७/प्र.क्र.०३/का. ०७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०४ सप्टेंबर, २०१८.

वाचा :- १) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्र.चौविआ १२१६/प्र.क्र.१०/का.०९, दिनांक ९.३.२०१६ व दिनांक २३.०८.२०१६

२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि -०६१७/प्र.क्र.२०/आ. पु. क. , दिनांक ९.६.२०१७

३) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र.Spl./Comp./३३७/२०१७, दिनांक ०४.०५.२०१७.

प्रस्तावना :-

१४ व्या केंद्रीय वित्त आयोगाने शिफारस केलेल्या "न्यायव्यवस्थेचे सक्षमीकरण" या प्रयोजनाकरिता सन २०१५-१६ ते २०१९-२० या पाच वर्षांच्या कालावधीकरिता महाराष्ट्र राज्यासाठी एकूण ११ घटकांसाठी रु.१०१४ कोटी इतक्या निधीची शिफारस केली आहे. वित्तीय वर्ष सन २०१५-१६ ते सन २०१९-२० या कालावधीकरिता "तांत्रिक मनुष्यबळ" या घटकाकरिता दिनांक २८.३.२०१६ रोजी झालेल्या उच्चस्तरीय संनियंत्रण समितीच्या बैठकीत रु. ६०.१३ कोटी इतके अनुदान १४ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार मंजूर करण्यात आलेले आहे. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांनी संदर्भ क्र. ३ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार १४ व्या वित्त आयोगांतर्गत तांत्रिक मनुष्यबळ सहाय्य या उद्दिष्टाखाली मा.उच्च न्यायालय व इतर न्यायालयांसाठी नियुक्त करावयाच्या ४० पदे सिनिअर सिस्टीम ऑफिसर व १५९ पदे सिस्टीम ऑफिसर अशा एकूण १९९ पदांना शासन निर्णय दिनांक ९.६.२०१७ अनुसार गठीत उपसमितीने दिनांक ३०.०७.२०१८ रोजीच्या बैठकीत मान्यता दिली आहे. यानुषंगाने ४० पदे सिनिअर सिस्टीम ऑफिसर व १५९ पदे सिस्टीम ऑफिसर अशा एकूण १९९ काल्पनिक पदांना मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

१४ व्या वित्त आयोगाच्या तांत्रिक मनुष्यबळ या उदिष्टाखाली मा.उच्च न्यायालय व इतर न्यायालयांसाठी सिनिअर सिस्टीम ऑफिसर -४० पदे व सिस्टीम ऑफिसर -१५९ पदे अशी एकूण १९९ काल्पनिक पदे निर्माण करुन बाह्ययंत्रणेद्वारे मार्च, २०२० पर्यंत (१४ व्या वित्त आयोगाच्या अंतिम कालावधीपर्यंत) भरण्यास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. ४० सिनिअर सिस्टीम ऑफिसर पदे व १५९ सिस्टीम ऑफिसर पदे अशा एकूण १९९ पदे नियुक्त करावयाच्या पदांची कर्तव्ये खालीलप्रमाणे आहेत:-

(१) सदर प्रस्तावाची पूर्तता झाल्यानंतर राज्यातील सर्व न्यायालयांचा संपूर्ण केस डाटा नियमितपणे National Judicial Data Grid (NJDG) येथे संकलित करणे.

(२) दररोज उद्भवणाऱ्या तांत्रिक बाबींसंदर्भात येणाऱ्या समस्यांचे निराकरण करणे.

(३) सर्व जिल्हा न्यायालयांचे व्यवस्थापन सुयोग्य रितीने करण्याकरिता जिल्ह्यातील न्यायाधिशांना National Judicial Data Grid (NJDG) वर अपलोड करावयाच्या केस डाटासंदर्भात देखरेख व त्याबाबतचे विश्लेषण याबाबतची सुविधा उपलब्ध करुन देणे.

(४) नवीन न्यायाधीश/कर्मचाऱ्यांचे प्रशिक्षण आयोजित करणे.

३. त्याप्रित्यर्थ होणारा खर्च हा१४ व्या वित्त आयोगाच्या तांत्रिक मनुष्यबळ सहाय्य या घटकांतर्गत "२०१४ न्यायदान" मागणी क्र.जे-१, २०१४ विधी व न्याय विभाग, न्यायदान, (१२) (०१) तांत्रिक मनुष्यबळ सहाय्य (अनिवार्य) (२०१४ ०५५७) या लेखाशिर्षाखाली “१० कंत्राटी सेवा" या उदिष्टांतर्गत भागविण्यात यावा.

४. सदर आदेश शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.१२०/आ.पु.क., दिनांक १५.०२.२०१८ अन्वये निर्गमित करण्यांत येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९०४१५४१०२५८१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Amogh Shyamkant Kaloti

Digitally signed by Amogh Shyamkant Kaloti
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1f733daf00a6028414c43d0cc10d82acab3b732c4edd56e818f8a3b355588753, serialNumber=9ebeebf21dc54ceec51e6d5ffc84bb94ca6af89497279007d66e97dc13547037, cn=Amogh Shyamkant Kaloti
Date: 2018.09.04 15:45:27 +05'30'

**(अ. शा. कलोती)**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव.**

**प्रति,**

१. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,

२. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,
४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर,
५. प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
११. लेखा अधिकारी, मुंबई (२ प्रती),
१२. वित्त विभाग, वित्त आयोग कक्ष, अर्थोपाय शाखा, व्यय-५, आपुक
१३. अर्थसंकल्प-११, मंत्रालय, मुंबई,
१४. सह सचिव/उप सचिव, का. ४, ९, ११, १३, २२, २३ व २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. निवड नस्ती.